**मुख्यमंत्री वैद्यकीय सहाय्यता कक्षाकडे अर्थसहाय्याची मागणी करणाऱ्या अर्जांची छाननी/तपासणी करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१७/प्र.क्र.५५८/राकावि-२

गोकूळदास तेजपाल रुग्णालय आवार, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : ७ सप्टेंबर, २०१७

**प्रस्तावना**

मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली सार्वजनिक विश्वस्त संस्था अधिनियमांतर्गत "मुख्यमंत्री सहायता निधी, मुंबई" असा न्यास गठीत करण्यात आला आहे. या न्यासामार्फत हृदयशस्त्रक्रिया, किडनी, मुत्रपिंडरोपण, कॅन्सर इत्यादी गंभीर स्वरुपाच्या विकारग्रस्त रुग्णांना शस्त्रक्रियेसाठी अर्थसहाय्य करण्यात येते. या अर्थसहाय्याशिवाय सार्वजनिक विश्वस्त संस्था अधिनियमांतर्गत नोंदणी केलेल्या रुग्णालयामार्फत गरीब व गरजू रुग्णांना स्वस्त दरात उपचार उपलब्ध करुन देणे बंधनकारक आहे. मात्र त्याबाबतचे संनियंत्रण करण्यासाठी स्वतंत्र व्यवस्था अस्तित्वात नव्हती. त्यामुळे मुख्यमंत्री सहायता निधी अंतर्गत देण्यात येणारे सहाय्य व सार्वजनिक विश्वस्त अधिनियमा अंतर्गत स्थापित रुग्णालये यांच्यामार्फत देण्यात येणारे सहाय्य यांचे संनियंत्रण करण्यासाठी मुख्यमंत्री सहायता निधी न्यासांतर्गत मुख्यमंत्री वैद्यकीय सहाय्यता कक्ष असा नवीन कक्ष दिनांक १३ ऑगस्ट २०१५ अन्वये स्थापन करण्यात आला आहे. सदर कक्षाचे बळकटीकरण करण्याचे संदर्भात आणि वैद्यकीय उपचारासाठी अर्थसहाय्याची मागणी करणाऱ्या अर्जांची उचित छाननी/तपासणी करण्यासाठी समिती स्थापन करण्याची आवश्यकता होती.

## शासन निर्णय-

वरील वस्तुस्थितीच्या अनुषंगाने मुख्यमंत्री वैद्यकीय सहाय्यता कक्षाचे बळकटीकरण करण्याचे संदर्भात आणि वैद्यकीय उपचारासाठी अर्थसहाय्याची मागणी करणाऱ्या अर्जांची उचित छाननी/तपासणी करण्यासाठी याद्वारे पुढीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | अध्यक्ष |
| २ | संचालक, वैद्यकीय शिक्षण | सह-अध्यक्ष |
| ३ | संचालक, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ४ | डॉ.आनंद बंग, सल्लागार आदिवासी आरोग्य, मुख्यमंत्री सचिवालय | सदस्य |
| ५ | श्री.ओमप्रकाश शेट्टे, वि.का.अ.,मुख्यमंत्री वैद्यकीय सहायता कक्ष | सदस्य |
| ६ | उप संचालक (निधी), मुख्यमंत्री वैद्यकीय सहायता कक्ष | सदस्य |
| ७ | लेखाधिकारी, मुख्यमंत्री सहायता निधी कक्ष | सदस्य सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :**

१) मुख्यमंत्री सहाय्यता निधीमधील कर्मचाऱ्यांना दैनंदिन कामात तांत्रिक सहाय्य तसेच अर्जाची छाननी करण्यासाठी आणि आवश्यकता असल्यास स्पष्टीकरण देण्यासाठी सहाय्य करतील. यासाठी वैद्यकीय शिक्षण विभागांतर्गत असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांचे एक पथक त्या विभागाकडून तयार करण्यात यावे.

२) हे पथक शिफारस करेल त्याच रुग्णांना वरील निकषांच्या आधारे अर्थसहाय्य देण्यात येईल.

३) मुख्यमंत्री सहाय्यता निधीकडून अर्थसहाय्य मिळण्यासाठी रुग्णांच्या आजाराची परिस्थिती पाहून तो अर्थसहाय्य मिळण्यास पात्र आहे किंवा कसे, हे तपासणे.

४) डॉक्टर, रुग्णालयांना अर्ज भरण्यासाठी सहाय्य करणे.

५) अन्य धर्मादाय संस्थाकडून अधिकचे अर्थसहाय्य मिळविण्यासाठी रुग्णांना मार्गदर्शन करणे.

६) वैद्यकीय उपचार करणाऱ्या अन्य संस्थाबरोबर संपर्क करणे व अतिरिक्त निधी मिळविण्यासाठी सुनिश्चिती करणे.

७) आरोग्यदायिनी योजनेमधून उपचारासाठी पात्र अशा रुग्णांना सहाय्य करणे आणि रुग्णालयाशी संपर्क साधणे.

८) राज्यातील धर्मादाय रुग्णालयातून पात्र रुग्णांना मदत मिळविण्यासाठी सहाय्य करणे आणि धर्मादाय योजनेचे कलम ४१ (ए) (ए) नुसार २०% कोटयामधुन पात्र रुग्णांना मदतीसाठी सहाय्य करणे. सदरच्या योजनेची काटेकोर अंमलबजावणी होत आहे की नाही, याची खातरजमा करणे.

९) मुख्यमंत्री वैद्यकीय सहाय्यता कक्ष, आरोग्यदायीनी योजना व धर्मादाय रुग्णालयातून उपलब्ध करुन देण्यात येणारे सहाय्य यापैकी एका सवलतीचा लाभ रुग्णांना देण्यात येत आहे, याची खातरजमा करण्यात यावी.

१०) या कक्षाच्या कामकाजाचा मा.मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये हे वेळोवेळी आढावा घेतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०७१५४८२८३९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7256abb8dd472637941e581488fb02eda9e0d6b701c434bcf471a0d525f80681, cn=Sanjay R More
Date: 2017.09.07 16:30:27 +05'30'

**संजय रा. मोरे**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. खाजगी सचिव, मा.मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

२. खाजगी सचिव, मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग

३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग

४. सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग
५. मा.मुख्यमंत्र्याचे अप्पर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
६. उप सचिव (प्रशासन) मुख्यमंत्री कार्यालय
७. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालक
८. डॉ.आनंद बंग, सल्लागार आदिवासी आरोग्य , मुख्यमंत्री सचिवालय
९. श्री.ओमप्रकाश शेट्टे, वि.का.अ., मुख्यमंत्री वैद्यकीय सहायता कक्ष
१०.उप संचालक (निधी), मुख्यमंत्री वैद्यकीय सहायता कक्ष
११.लेखाधिकारी, मुख्यमंत्री सहायता निधी कक्ष
१२.निवडनस्ती (राकावि-२).